**बुलढाणा जिल्ह्यातील शासकीय गोदामातील अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी हमाल कंत्राट निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कंत्राट १२१४/प्र.क्र.१५६/ना.पु.१६अ**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ सप्टेंबर, २०१५

वाचा - (१) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.,क्र.कंत्राट-१२१४/प्र.क्रं.१५६/ना.पु.१६अ, दि. १२ सप्टेंबर, २०१४.

(२) शासन शुद्धीपत्रक, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.,क्र.कंत्राट-१२१४/प्र.क्रं.१५६/ना.पु.१६अ, दि. ०७ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना —**

राज्यातील सांगली, बीड, वर्धा, बुलढाणा, उस्मानाबाद, वाशिम व रत्नागिरी हे सात जिल्हे वगळून अन्य जिल्ह्यांमधील शासकीय गोदामातील अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी हमाल कंत्राटाच्या निश्चितीस संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

या शासन निर्णयान्वये वगळण्यात आलेल्या जिल्ह्यांपैकी बुलढाणा जिल्ह्यामध्ये हमाल कंत्राटदार संस्थांमार्फत शासकीय धान्य गोदामातील अन्नधान्य हताळणूक चालू ठेवण्यात यावी, अशी निवेदने लोकप्रतिनिधींकडून शासनास प्राप्त झाल्याने हा जिल्हा हमाल कंत्राट पद्धती रद्द करण्यासाठी प्रायोगिक स्तरावर निवडण्यात आलेल्या जिल्ह्यांमधून वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय—**

राज्यातील सांगली, बीड, वर्धा, बुलढाणा, उस्मानाबाद, वाशिम व रत्नागिरी या ७ जिल्ह्यांमधील सर्व शासकीय गोदामांमध्ये कंत्राटी पद्धत रद्द करून तेथे माथाडी मंडळाकडून कामगार घेण्याची कार्यपद्धती कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. यामधून बुलढाणा जिल्हा वगळण्यात येत असून या जिल्ह्यामध्ये संदर्भ क्र. १ व २ येथील दि.१२ सप्टेंबर, २०१२ रोजीच्या शासन निर्णयातील व दि.०७ जानेवारी, २०१५ रोजीच्या शासन शुद्धीपत्रकातील तरतूदीनुसार हमाल कंत्राटाच्या निश्चितीची कार्यवाही करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१११७३३२६४५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2015.09.11 17:36:34 +05'30'

**( सतिश श्रीधर सुपे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त अमरावती विभाग
२) कामगार आयुक्त, कॉमर्स सेंटर ताडदेव, मुंबई.
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
५) जिल्हाधिकारी अमरावती
६) उपायुक्त (पुरवठा) अमरावती विभाग
७) उपायुक्त (कामगार) अमरावती विभाग
८) जिल्हा पुरवठा अधिकारी अमरावती
९) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१०) जिल्हा अध्यक्ष, जिल्हा माथाडी मंडळ, बुलढाणा
११) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१७) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
१८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९) निवड नस्ती/नापु-१६अ.